एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे आस्थापनेवरील ४३ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२३ ते दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. मबाआ-२०२३/प्र.क्र. २४ /का-७-अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ०८.०३.२०२३.

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७ दि. ५.४.२००३,
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र. असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ४.१०.२००४,
३) शासन निर्णय,क्र.मबाआ-२०१४/प्र.क्र.२४२(भाग-१)/का-७, दि.०५.०९.२०१४,
४) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ- २०२२ / प्र.क्र.५६ / का- ७ अ, दि.३०.०८.२०२२,
५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे पत्र क्र. एबाविसेयो / का- १ / अपदे / पदे नि.मान्यता / २०२२-२३ / ५४९, दि.१३.०२.२०२३,
६) शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.०८.०२.२०२३.

**प्रस्तावना:-**

आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांच्या आस्थापनेवरील ४३ अस्थायी पदांना दिनांक ०१.०९.२०२२ ते दिनांक २८.०२.२०२२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास संदर्भाधीन क्रमांक-४ येथील दिनांक ३०.०८.२०२२ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी संदर्भाधीन क्रमांक-५ येथील दिनांक १३.०२.२०२३ च्या पत्रान्वये ४३ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक-६ येथील दिनांक ०८.०२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना, तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या, परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२३ ते दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

३. सदरहू पदे सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत, असे आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई संदर्भाधीन क्रमांक-५ येथील दिनांक

१३.०२.२०२३ च्या पत्रान्वये प्रमाणित केले आहे. त्यानुसार एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांना मुदतवाढ देणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या आस्थापनेवरील ४३ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२३ ते दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत या शासन निर्णयाद्वारे मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर पदांची वेतनश्रेणी व संवर्गनिहाय माहिती सोबतच्या विवरणपत्रामध्ये दर्शविण्यात आलेली आहे.

२. सदरचा शासन निर्णय, वित्त विभाग पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दिनांक ०८.०२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२८१७३९०४०८३० असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Digitally signed by SUNIL DEORAO SARDAR
Date: 2023.03.28 17:44:04 +05'30'

**( सुनिल सरदार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई,
२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे,
३. महालेखापाल,महाराष्ट्र राज्य १/२ (लेखा व अनुज्ञेयता) ( लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,
४. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा,ठाणे (आयुक्तालय, नवी मुंबई मार्फत),
५. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
७. संबधित जिल्हा कोषागार अधिकारी,(आयुक्तालय, नवी मुंबई मार्फत),
८. वित्त विभाग (का-व्यय-१४/अर्थसंकल्प-१९/वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय,मुंबई,
९. निवड नस्ती, का-७अ.

**शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्रमांक मबाआ - २०२३ / प्र.क्र.२४ / का-७ अ, दि. ०८.०३.२०२३**

**सोबतचे विवरणपत्र-अ**

| अ. क्र. | पदनाम | वेतनस्तर | वेतनश्रेणी | मंजूर पदे |
|---|---|---|---|---|
| १ | संचालक/आयुक्त | Level-१४ | Cell-३ भा.प्र.से. | १ |
| २ | सह संचालक/सह आयुक्त | S-२५ | १५६००-३९१००/७६०० | १ |
| ३ | उप संचालक/ उपआयुक्त | S-२३ | १५६००-३९१००/६६०० | ३ |
| ४ | सहा. आयुक्त( गट अ) /कार्यक्रम अधिकारी / सहाय्यक संचालक (वित्त व लेखा) | S-२० | १५६००-३९१००/५४०० | ६ |
| ५ | लेखाधिकारी | S-१५ | ९३००-३४८००/४६०० | १ |
| ६ | कार्यालय अधीक्षक | S-१४ | ९३००-३४८००/४३०० | २ |
| ७ | लेखापाल/सहा.लेखाधिकारी | S-१५ | ९३००-३४८००/४४०० | २ |
| ८ | लघुलेखक (उच्चश्रेणी) | S-१६ | ९३००-३४८००/४४०० | २ |
| ९ | लघुलेखक (निम्नश्रेणी) | S-१४ | ९३००-३४८००/४३०० | २ |
| १० | अधीक्षक/प्रमुख लिपिक (लेखा) | S-१३ | ९३००-३४८००/४२०० | ६ |
| ११ | सांख्यिकी सहायक/वरिष्ठ लिपिक | S-८ | ५२००-२०२००/२४०० | ९ |
| १२ | कनिष्ठ लिपिक/कनिष्ठ सहाय्यक | S-६ | ५२००-२०२००/१९०० | ४ |
| १३ | शिपाई | S-१ | ४४४०-७४४०/१३०० | ४ |
| | **एकूण** | | | **४३** |

Digitally signed by SUNIL DEORAO SARDAR
Date: 2023.03.28 17:44:22 +05'30'

**(सुनिल सरदार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**